राष्ट्रीय विकलांग वित्त व विकास महामंडळाची
प्राधिकृत वाहिनी म्हणून महाराष्ट्र राज्य अपंग वित्त
व विकास महामंडळ(म.) यांना मान्यता देणेबाबत

# महाराष्ट्र शासन

सामाजिक न्याय,सांस्कृतिक कार्य,क्रीडा व विशेष सहाय्य विभाग,
शासन निर्णय क्र. अविम-२००२/प्र.क्र.१२७/सुधार-३,
मंत्रालय विस्तार भवन,मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २५जून, २००२

वाचा : १) शासन निर्णय,समाजकल्याण,सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग क्र.इडीडी-१०९८/प्र.क्र.२०६/सुधार-३, दि.१ सप्टेंबर १९९८

२) शासन निर्णय,सामाजिक न्याय,सांस्कृतिक कार्य,क्रीडा व विशेष सहाय्य विभाग क्र.इडीडी-२००१/प्र.क्र.६५ सुधार-३, दि.२१ नोव्हेंबर २००१

३) व्यवस्थापकीय संचालक,महाराष्ट्र राज्य अपंग वित्त व विकास महामंडळ(म.) यांचे पत्र क्र.मराअविविम/२९/व्यसं. दि.४.४.२००२

**शासन निर्णय :** केंद्र शासनाच्या राष्ट्रीय विकलांग वित्त एवं विकास निगम,फरिदाबाद या महामंडळाची महाराष्ट्र राज्याची प्राधिकृत चॅनेलाईजिंग एजन्सी म्हणून दि.१ सप्टेंबर ९८ च्या शासन निर्णयान्वये महात्मा फुले मागासवर्गीय विकास महामंडळाची नियुक्ती करण्यात आली होती. आता शासनाने दि.२१ नोव्हेंबर २००१ च्या शासन निर्णयान्वये राज्यात महाराष्ट्र राज्य अपंग वित्त व विकास महामंडळाची स्थापना केलेली आहे. त्यामुळे सदर महामंडळास राष्ट्रीय विकलांग वित्त व विकास महामंडळाची चॅनेलाईजिंग एजन्सी म्हणून घोषित करण्याबाबतचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता. त्याबाबत शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे:-

१) राष्ट्रीय विकलांग वित्त एवं विकास निगम,फरिदाबाद या महामंडळाची राज्यातील अपंगांची कर्ज प्रकरणे करण्याकरिता महाराष्ट्र राज्य अपंग वित्त व विकास महामंडळास चॅनेलाईजिंग एजन्सी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

२) येथे स्पष्ट करण्यात येते की, वरीलप्रमाणे महाराष्ट्र राज्य अपंग वित्त व विकास महामंडळास चॅनेलाईजिंग एजन्सी म्हणून घोषित करण्यात आले असले तरी महात्मा फुले मागासवर्गीय विकास महामंडळातर्फे ८९ लाभार्थीना करण्यात आलेल्या कर्जाच्या रक्कमेची वसुली संबंधित लाभार्थ्यांकडून करून राष्ट्रीय विकलांग वित्त व विकास महामंडळास अदा करण्याची जबाबदारी महात्मा फुले मागासवर्गीय विकास महामंडळाची राहील.

३) महाराष्ट्र राज्य अपंग वित्त व विकास महामंडळाने केंद्र शासनाने घालून दिलेल्या अटींची योग्य ती शहानिशा करून व आवश्यक ती अपंगांची कर्ज प्रकरणे तयार करून मान्यतेसाठी राष्ट्रीय विकलांग वित्त एवं विकास निगम यांचेकडे पाठविण्याबाबत तातडीने कार्यवाही करावी.

20020918112105000-1500

२. हा शासन निर्णय नियोजन विभाग व वित्त विभाग यांच्या सहमतीने वित्त विभागाच्या अनौ.संदर्भ क्र.२९७/०२/व्यय-५,दि.३१.५.२००२ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

(सु.द. चव्हाण)

अवर सचिव,महाराष्ट्र शासन

प्रति,

व्यवस्थापकीय संचालक,महाराष्ट्र राज्य अपंग वित्त व विकास महामंडळ,मुंबई
व्यवस्थापकीय संचालक,महात्मा फुले मागासवर्ग विकास महामंडळ,मुंबई
व्यवस्थापकीय संचालक,लोकशाहीर अण्णाभाऊ साठे विकास महामंडळ,मुंबई
व्यवस्थापकीय संचालक,महाराष्ट्र राज्य चर्मोद्योग विकास महामंडळ,मुंबई
व्यवस्थापकीय संचालक,वसंतराव नाईक विमुक्त जाती भटक्या जमाती विकास महामंडळ,मुंबई
व्यवस्थापकीय संचालक,इतर मागासवर्ग विकास महामंडळ,मुंबई
व्यवस्थापकीय संचालक,राष्ट्रीय विकलांग वित्त एवं विकास निगम,फरिदाबाद
आयुक्त,अपंग कल्याण,महाराष्ट्र राज्य,पुणे
संचालक,समाजकल्याण,महाराष्ट्र राज्य,पुणे
आयुक्त,विमुक्त जाती भटक्या जमाती,महाराष्ट्र राज्य,पुणे.
सर्व मंत्रालयीन विभाग
सर्व जिल्हाधिकारी
सर्व विभागीय समाजकल्याण अधिकारी,
सर्व जिल्हा समाजकल्याण अधिकारी
नियोजन विभाग,मंत्रालय,मुंबई
वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई
मा.मंत्री(सा.न्या.) यांचे खाजगी सचिव
मा.राज्यमंत्री(सा.न्या.) यांचे खाजगी सचिव
प्रधान सचिव(सा.न्या.) यांचे स्टाफ ऑफिसर
सर्व कार्यासने,सा.न्या.,सां.का.,क्री.व वि.स.विभाग,मंत्रालय,मुंबई
निवड नस्ती,का.मावक-3